**राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत “खार जमीन संशोधन केंद्र, पनवेल येथे प्रयोगशाळा बळकटीकरण आणि जमिनीचे आरोग्य व मत्स्य उत्पादन याबाबत शेतक-यांची क्षमता विकसित करणे” या प्रकल्पाच्या रु.४१९.०० लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि ,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्रमांक : कोकृवि-११२२/प्र.क्र.५३/७-अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ०५ एप्रिल, २०२२.

**संदर्भ:**

१. राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्य स्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या २३ व्या बैठकीचे इतिवृत्त-शासन पत्र जा.क्र.आरकेव्ही-०३१७/प्र.क्र.१४/आरकेव्हीवाय सेल,दि.०९ जून, २०१७.
२. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र जा.क्र. कृआ/राकृवियो/टी-१/०२२/४४८८, दि.०४ फेब्रुवारी, २०२२.
३. संचालक (संशोधन), डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांचे पत्र क्र. डॉबासाकोकृवि/संशो-३/४१२/२०२२, दि.१८ फेब्रुवारी, २०२२.
४. संचालक (विस्तार शिक्षण व सासावि), कृषि परिषद, पुणे यांचे पत्र क्र.मकृप/वि.शि./५०५/२०२२, दि.२२ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना :**

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखालील २३ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीमध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत खार जमीन संशोधन केंद्र, पनवेल येथे प्रयोगशाळा बळकटीकरण आणि जमिनीचे आरोग्य व मत्स्य उत्पादन याबाबत शेतक-यांची क्षमता विकसित करणे हा प्रकल्प डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली विद्यापीठात सन २०१७-१८ ते २०२०-२१ मध्ये राबविण्यास मान्यता देण्यात आली होती. सदर प्रकल्पांतर्गत राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्याच्या स्वरूपात रु.४१९.०० लाख निधी उपलब्ध करून दिला जाणार आहे. सदर प्रकल्प अद्याप अपूर्ण असून तो सन २०२२-२३ पर्यंत राबविण्यास रु.४१९.०० लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

**१.** राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत खार जमीन संशोधन केंद्र, पनवेल येथे प्रयोगशाळा बळकटीकरण आणि जमिनीचे आरोग्य व मत्स्य उत्पादन याबाबत शेतक-यांची क्षमता विकसित करणे या प्रकल्पांतर्गत रु.४१९.०० लाख (रुपये चार कोटी एकोणीस लाख फक्त) निधीचा कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर प्रकल्प राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली विद्यापीठात राबविण्यात यावा.

**२.** संचालक (संशोधन), डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांचे सनियंत्रणाखाली प्रकल्पाची अंमलबजावणी कृषि विभागामार्फत करण्यात यावी व त्यांनी प्रकल्पाचा आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घ्यावी, तसेच वेळोवेळी खर्चाचे लेखा परिक्षित उपयोगिता प्रमाणपत्रे सादर करावीत.

**३.** सदर प्रकल्पखर्चाचे विवरण पुढीलप्रमाणे:

(रु.लाखांत)

| अ.क्र. | घटक | एकूण किंमत | राकृवियो अंतर्गत मंजूर निधी |
|---|---|---|---|
| १. | शेतक-यांना एकात्मिक शेती प्रणाली व मत्स्य उत्पादन यांचे प्रशिक्षण | २.१६ | २.१६ |
| २. | प्रयोगशाळा नूतनीकरण | ११२.४४ | ११२.४४ |
| ३. | प्रयोगशाळा उपकरणे व शेती अवजारे | ५५.४० | ५५.४० |
| ४. | माती क्षारता मूल्यांकन आणि माती गुणधर्म विश्लेषण | ६.०० | ६.०० |
| ५. | शेती विकास | १४४.०० | १४४.०० |
| ६. | मत्स्य बीज खरेदी व संगोपन | ९५.०० | ९५.०० |
| ७. | प्रशासकीय खर्च | ४.०० | ४.०० |
| **एकूण** | | **४१९.००** | **४१९.००** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०४०५१४३७१५८७०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Balasaheb Kisan Raskar

Digitally signed by Balasaheb Kisan Raskar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aaa93f4d4e49359ddfdb4a9eb4176d16d9032454ac5c700ad6e2a7ad0b3115db, pseudonym=5EAA59C86FCC105FE11B11B0E29C44034464028D, serialNumber=2CF78D68CEEAC33CA63C8A2F2B360EBF1C6AC77C6A1AD4C5BFB24951806AF0A8, cn=Balasaheb Kisan Raskar
Date: 2022.04.05 14:38:11 +05'30'

**(बा.कि.रासकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई ,
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,पुणे,
३) महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
४) कुलगुरु/कुलसचिव, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली
५) संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय,पुणे,

६) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८) मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९) मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ,
१०) संचालक(संशोधन), डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली
११) विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
१२) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३) प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र , मुंबई /नागपूर,
१४) प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) , महाराष्ट्र , मुंबई /नागपूर,
१५) संचालक, लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई,
१६) सहसंचालक, लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५वा मजला, मुंबई ,
१७) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी,
१८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१९) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
२०) राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१) निवड नस्ती.